**<u>राज्य मराठी विकास संस्थेच्या नियामक मंडळावर अशासकीय सदस्यांची नियुक्ती करण्याबाबत......</u>**

# महाराष्ट्र शासन

## मराठी भाषा विभाग

## शासन निर्णय क्रमांकः रामवि १०१४/ प्र.क्र.४४/२०१४/भाषा - ३

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक : १७ ऑक्टोबर, २०१५

**<u>वाचा :-</u>**

१) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.मविस २००५/प्र.क्र.४१४/०५/५,दि.७ सप्टेंबर, २००६.

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. प्रवास १०१०/प्र.क्र.२/सेवा ५, दिनांक ३ मार्च, २०१०.

**<u>प्रस्तावना :-</u>**

सामान्य प्रशासन विभागाच्या दि. ७ सप्टेंबर, २००६ च्या शासन निर्णयान्वये राज्य मराठी विकास संस्थेच्या अशासकीय सदस्यांची नियुक्ती या शासन निर्णयाच्या दिनांकापासून ३ वर्षांच्या कालावधीकरीता म्हणजेच सन २००९ पर्यंत करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानंतर अद्याप नवीन अशासकीय सदस्यांची नेमणूक करण्यात आली नाही. तथापि, संस्थेच्या सुधारीत घटनेतील नियम १२ मधील तरतूदीनुसार कार्यरत असलेल्या अशासकीय सदस्यांच्या नियुक्तीचा तीन वर्षांचा कालावधी संपल्यानंतर नवीन अशासकीय सदस्यांची नियुक्ती होईपर्यत तेच सदस्य नियामक मंडळाचे सदस्य म्हणून कामकाज पाहतील, अशी तरतूद असल्याने, सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त शासन निर्णयान्वये नियुक्त करण्यात आलेल्या अशासकीय सदस्यांचा ३ वर्षांचा कालावधी सन २००९ मध्ये संपुष्टात आला असूनही, नवीन अशासकीय सदस्यांची नेमणूक झाली नसल्यामुळे अद्याप, तेच अशासकीय सदस्य संस्थेच्या नियामक मंडळाचे अशासकीय सदस्य म्हणून कार्यरत आहेत. सदर वस्तुस्थिती विचारात घेऊन राज्य मराठी विकास संस्थेच्या नियामक मंडळावर नवीन अशासकीय सदस्यांची नियुक्ती करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय :-

या शासन निर्णयान्वये राज्य मराठी विकास संस्थेच्या नियामक मंडळावर खालील मान्यवर व्यक्तींची अशासकीय सदस्य म्हणून या शासन निर्णयाच्या दिनांकापासून ३ वर्षांच्या कालावधीकरीता नियुक्ती करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | अध्यक्ष, अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ | अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ |
| २. | डॉ.शामा घोणसे | मराठी साहित्यक्षेत्रातील समीक्षक |
| ३. | श्री.लक्ष्मीनारायण बोल्ली | मराठी साहित्यक्षेत्रातील ललित लेखक |
| ४. | डॉ.विनय सहस्त्रबुध्दे | मानव्यविद्या क्षेत्रातील तज्ज्ञ व्यक्ती |
| ५. | श्री.दिपक घैसास | तंत्रज्ञान क्षेत्रातील तज्ज्ञ व्यक्ती |

| | | |
|---|---|---|
| ६. | श्री.राजेंद्र साहेबराव दहातोंडे | कृषिविज्ञान क्षेत्रातील तज्ज्ञ व्यक्ती |
| ७. | प्रा.अरुण यार्दी | महाराष्ट्राबाहेरील मराठीच्या प्राध्यापकांचा प्रतिनिधी |
| ८. | श्रीमती रेणू दांडेकर | शिक्षणशास्त्र क्षेत्रातील तज्ज्ञ व्यक्ती |
| ९. | श्री.अमर हबीब | प्रसार माध्यम प्रतिनिधी |
| १०. | डॉ.उदय निर्गुडकर | प्रसार माध्यम प्रतिनिधी |
| ११. | डॉ.विद्यागौरी टिळक | महाराष्ट्रातील विद्यापीठांच्या मराठी विभागाचा प्रतिनिधी |
| १२. | श्री.अनय जोगळेकर | मराठीच्या विकासाचे काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मराठी संस्थांचा एक प्रतिनिधी |
| १३ | डॉ.भारत देगलूरकर | मराठीच्या विकासाचे काम करणाऱ्या महाराष्ट्राबाहेरील मराठी संस्थांचा एक प्रतिनिधी |
| १४. | श्रीमती सोनल जोशी कुलकर्णी | भाषा विज्ञान क्षेत्रातील तज्ज्ञ व्यक्ती |
| १५. | डॉ.रंजन गर्गे | विज्ञान क्षेत्रातील तज्ज्ञ व्यक्ती |
| १६. | श्री.नंदेश उमप | लोकसंस्कृती क्षेत्रातील तज्ज्ञ व्यक्ती |
| १७. | डॉ.अविनाश पांडे | महाराष्ट्रातील विद्यापीठांमधील भाषाविज्ञान विभागांचा प्रतिनिधी |
| १८. | श्री.श्रीराम दांडेकर | महाराष्ट्रातील उद्योजक, व्यापार व्यवस्थापक यांचा एक प्रतिनिधी |
| १९. | श्री.कौशल इनामदार | रंगभूमी,प्रयोगकला व चित्रपट यांचा एक प्रतिनिधी |
| २०. | श्री.शिवाजीराजे भोसले | बृहन्महाराष्ट्र परिषदेने नियुक्त केलेला एक प्रतिनिधी |
| २१. | श्रीमती रेखा दिघे | जागतिक मराठी परिषदेचा प्रतिनिधी |

राज्य मराठी विकास संस्थेच्या नियामक मंडळावरील अशासकीय सदस्यांना वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक-प्रवास-१०१०/प्र.क्र.२/सेवा-५, दिनांक ३ मार्च,२०१० मधील तरतुदीनुसार प्रवासभत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०१७१७१८०८७२३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Aparna Arvind Gawde

Digitally signed by Aparna Arvind Gawde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Aparna Arvind Gawde
Date: 2015.10.17 17:48:30 +05'30'

अपर्णा अ. गावडे
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव,

२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
४. मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
५. मा.मंत्री (मराठी भाषा) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. संचालक, भाषा संचालनालय, मुंबई,
८. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
९. शिक्षण संचालक (उच्च शिक्षण व प्रौढ शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०. संचालक, शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे,
११. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे,
१२. संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे,
१३. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई,
१४. संचालक, आदिवासी संशोधन व विकास संस्था, पुणे,
१५. संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई
१६. प्रशासकीय अधिकारी, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई,
१७. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
१८. सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,
१९. सर्व अशासकीय सदस्य, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई
२०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १, मुंबई
२१. महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र -१, मुंबई
२२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
२४. अवर सचिव (भाषा), मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२५. निवड नस्ती.